**तंबाखुमुक्त शैक्षणिक संस्था अभियानातंर्गत राज्यातील सर्व शासकीय व अनुदानित आश्रमशाळा तंबाखुमुक्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक- डीडीपी-२०१८/प्र.क्र.२५४/सामासु**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०२ नोव्हेंबर, २०१८.

**शासन परिपत्रक :-**

राज्यामध्ये सामाजिक न्याय विशेष सहाय्य विभागांमार्फत ५०२ शासकीय आश्रमशाळा व अनुदानित आश्रमशाळांमध्ये अनुसुचित जातीचे विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. महाराष्ट्रातील सर्व शैक्षणिक संस्था तंबाखूमुक्त व्हाव्यात व मुलांना तंबाखूमुक्त वातावरण मिळावे यासाठी ३० जिल्ह्यात जिल्हा परिषद शाळांसोबत तंबाखूमुक्त शैक्षणिक संस्था हा कार्यक्रम सलाम मुंबई फाउंडेशन या संस्थेने राबविला आहे. तसेच सदर संस्था गेल्या पाच वर्षापासून व्यसनमुक्तीचे कार्य करीत असून सदर संस्थेस महात्मा गांधी व्यसनमुक्ती सेवा पुरस्कार प्रदान केलेला आहे. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत चालविण्यात येणाऱ्या आश्रमशाळांमध्ये तंबाखुमुक्त शैक्षणिक संस्था अभियान राबविण्याबाबत सलाम मुंबई फाउंडेशन यांनी प्रस्ताव शासनास सादर केला असून सदर संस्था हे अभियान राबविण्यासाठी आवश्यक ते सहकार्य करणार आहे. त्यानूसार विभागातंर्गत येणाऱ्या शासकीय व अनुदानित आश्रमशाळांमध्ये तंबाखुमुक्त शैक्षणिक संस्था अभियान राबविण्याबाबतचा निर्णय शासनाचा विचाराधीन होता. त्यानूसार खालीलप्रमाणे सुचना देण्यात येत आहेत.

**<u>तंबाखुमुक्त शाळा उपक्रम :-</u>**

(१) मुख्याध्यापकांनी शाळेत तंबाखू सेवनास बंदी असल्याची नोटीस काढावी. सर्व शिक्षक, विद्यार्थी, कर्मचारी, पालक, शालेय व्यवस्थापन समितीचे सदस्य यांना ही नोटीस वाचून दाखववी. सदर नोटीसची एक प्रत शाळेच्या प्रवेशद्वाराजवळ अथवा दर्शनीय ठिकाणी लावावी.

(२) शाळेत नियंत्रण समितीची स्थापना करावी आणि समितीच्या मासिक बैठका आयोजित कराव्यात. वेगळी समिती बनविणे शक्य नसल्यास शाळा व्यवस्थापन समितीच्या बैठकीत तंबाखूमुक्त शैक्षणिक संस्थेच्या निकषांच्या पूर्ततेचा आढावा घेत रहावा आणि त्याचे निर्णय आणि अहवाल संग्रहित करावेत.

(३) धुम्रपान आणि तंबाखू निषिध्द क्षेत्र शालेय परिसरात धुम्रपान आणि तंबाखूजन्य पदार्थाचे सेवन करणे गुन्हा आहे असे पक्के फलक शाळेत महत्वाच्या ठिकाणी लावणे.

(४) तंबाखूचे दुष्परिणाम व तंबाखू नियंत्रण कायद्याची माहिती व्हावी यासाठी शाळेत पोस्टर्स, घोषणापट्ट्या आणि नियम लावणे. (तंबाखूमुक्त शाळा/परिसर ह्यावर विद्यार्थ्यांसाठी चर्चासत्र/पथनाट्य/समूहगान/निबंध स्पर्धेचे आयोजन करावे.)

(५) तंबाखू विरोधी संदेश शैक्षणिक संस्थेच्या स्टेशनरीवर लिहिणे/चिकटवणे, सदर पोस्टर्स, घोषणापट्ट्या, नियम आणि संदेश हे विद्यार्थ्यांकडून तयार करुन घ्याव्यात आणि प्रत्येक वर्गावर्गात लावावेत.

(६) मुख्याध्यापकांनी आपल्या कार्यालयात तंबाखू नियंत्रण कायदा, २००३ आणि अध्यादेश ह्यांची प्रत ठेवावी. कायद्याची प्रत वेबसाईटवर उपलब्ध आहे.

(७) तंबाखू नियंत्रणासाठी नियुक्त राज्य सल्लागार प्रतिनिधी, मुंबई/प्राथमिक आरोग्य केंद्र/खाजगी दवाखाना/इंडियन डेन्टिस्ट असोसिएशनचे सदस्य यांची तंबाखूमुक्त शाळेसाठी पत्र लिहून मदत घेणे.

(८) शाळेने नजिकच्या प्राथमिक आरोग्य केंद्र, खाजगी दवाखाना, डेन्टिस्ट, इंडियन डेन्टिस्ट असोसिएशनचे सदस्य यापैकी एका वैद्यकीय अधिकाऱ्यास बोलावून शाळेत तंबाखूचे दुष्परिणाम, कॅन्सरची लक्षणे या विषयांवर एक सत्र आणि आरोग्य/मुख तपासणी असे उपक्रम आयोजित करावे.

(९) शाळेच्या १०० यार्ड परिसरात तंबाखूजन्य पदार्थाच्या विक्रीवर पूर्णत: बंदी असणे. सदर संदर्भात शाळेच्या मुख्य प्रवेशद्वाराजवळ फलक लावावा.

(१०) शाळेत जे शिक्षक, कर्मचारी आणि विद्यार्थी तंबाखू नियंत्रणासाठी हिहिरीने कार्य करीत आहेत. त्यांच्या मुख्याध्यापकांनी प्रमाणपत्र/ग्रिटींगकार्ड / पुष्पगुच्छ देऊन जाहीर सत्कार करावा.

(११) वरील सर्व निकष पूर्ण झाल्यावर शाळेच्या मुख्य प्रवेशद्वाराजवळ तंबाखूमुक्त शाळा किंवा तंबाखूमुक्त शैक्षणिक संस्था परिसर असा फलक लावावा. शाळेचे पालक आणि शाळा व्यवस्थापन समितीच्या सदस्यांसमोर शाळा तंबाखूमुक्त असल्याचे घोषित करावे.

२. सर्व सहाय्यक आयुक्त, प्रादेशिक उपायुक्त, सामाजिक न्याय विभाग यांनी आपल्या अधिनस्त असलेल्या शासकीय व अनुदानित आश्रमशाळांमध्ये तंबाखुमुक्त शैक्षणिक संस्था अभियान राबविण्याबाबत आवश्यक त्या सुचना संबंधित मुख्याध्यापकांना देण्यात याव्यात.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८११०२१६०४०१३३२२ असा आहे. हा शासन निर्णय डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by S.G. Patil
Date: 2018.11.02 16:09:44 +05'30'

**(सं. गि. पाटील)**

**उप सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत : माहितीस्तव.**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.४०० ०३२.
३. मा.मंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. सर्व मा. मंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग), मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२.
६. सर्व मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. सर्व मा. विधानसभा सदस्य.
८. सर्व मा. विधानपरिषद सदस्य.
९. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०. मा. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११. मा. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१२. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. आयुक्त, अपंग कल्याण, पुणे.
१४. सर्व जिल्हाधिकारी.
१५. सर्व प्रादेशिक उपायुक्त/सह आयुक्त, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
१६. सर्व मुख्याध्यापक शासकीय व अनुदानित आश्रमशाळा( प्रकल्प अधिकारी यांचेमार्फत)
१७. सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकरी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय, मुंबई.